**कोकण विभागातील महाराष्ट्र विकास सेवा**
**गट-ब मधील अधिका-यांच्या बदल्या/नियुक्त्या**

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास व जलसंधारण विभाग**
**शासन आदेश, क्रमांक : मविसे १०/२०११/प्र.क्र. १२/ आस्था-३अ**
**मंत्रालय,मुंबई-४०० ०३२**
**दिनांक:- ६ मे , २०११.**

**संदर्भ :- शासन आदेश,ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र. मविसे १०/२००६/प्र.क्र. २४२/ आस्था-३, दिनांक १० नोव्हेंबर २००६.**

**आदेश :-** ग्राम विकास व जलसंधारण विभागाच्या अखत्यारितील, कोकण विभागातील महाराष्ट्र विकास सेवा गट -ब मधील अधिकारी श्री.डी.वाय.जाधव यांची संदर्भाधीन दिनांक १०.११.२००६ च्या आदेशान्वये प्रतिनियुक्तीने पदस्थापना सल्लागार (मानव संशोधन विकास ) संवाद व क्षमता विकास कक्ष,सिडको भवन, बेलापूर या पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाच्या अखत्यारितील पदावर करण्यात आली आहे. त्यांची प्रतिनियुक्ती संपवून त्यांना अन्यत्र नियुक्ती देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.सबब,सार्वजनिक सेवेच्या हितार्थ महाराष्ट्र शासकीय कर्मचा-यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडतांना होणा-या विलंबास प्रतिबंध अधिनियम,२००५ मधील तरतुदीनुसार बदली करण्यास सक्षम असलेल्या प्राधिका-यांच्या मान्यतेने महाराष्ट्र विकास सेवा, गट-ब मधील **श्री.डी.वाय.जाधव यांची या आदेशान्वये सहाय्यक प्रकल्प अधिकारी (संनियंत्रण) , जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, ठाणे** या रिक्त पदावर पदस्थापना करण्यात येत आहे

२. **श्री.डी.वाय.जाधव** यांनी त्यांच्या नवीन पदाचा पदभार त्वरीत स्वीकारावा. तसेच त्यांनी अनधिकृत रजेवर जाऊ नये. त्यांचे लक्ष सामान्य प्रशासन विभागाच्या क्र.सीडीआर १०८२/२५६७/२८/अकरा दि.३०.८.१९८२ च्या परिपत्रकाकडे वेधण्यात येत आहे.

३. उप सचिव,पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,( कार्यासन पापु-११) यांना विनंती करण्यात येते की, त्यांनी उक्त अधिका-यास त्यांच्या सध्याच्या पदभारातून पदमुक्त करावे व त्यांना नवीन नेमणूकीच्या जागी तात्काळ रुजू होण्यास सांगावे.

४. **श्री.डी.वाय.जाधव** यांनी नवीन नियुक्तीच्या ठिकाणी हजर व्हावे झाल्यानंतर पदभार स्वीकारल्याचा दिनांक शासनास कळवावा.

३. सदर आदेश महाराष्ट्र शासनाच्या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यांत आले असून त्याचा संगणक सांकेतांक २०११०५०६१७१४३९००१ असा आहे .

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

**( रि.इ.शेख )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रति,

विभागीय आयुक्त, कोकण विभाग, नवी मुंबई
मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, ठाणे
प्रकल्प संचालक,जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, ठाणे
महालेखापाल- १ ( लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता ), महाराष्ट्र राज्य, मुंबई
श्री.डी.वाय.जाधव
मा.मंत्री ( ग्राम विकास ) यांचे खाजगी सचिव
मा.राज्यमंत्री ( ग्राम विकास ) यांचे खाजगी सचिव
प्रधान सचिव ( पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग ) यांचे स्वीय सहायक.
मा.सचिव ( ग्राम विकास व पंचायत राज ) यांचे स्वीय सहायक.
उप सचिव , पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग , पापु ११, सिडको भवन, बेलापूर
कार्यासन क्रमांक : आस्था - २ ग्राम विकास व जलसंधारण विभाग